


**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,मंत्रालय,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२**

**दुरध्वनी क्र. ०२२-२२०४८२४७** Email ID : dokh.rfd@maharashtra.gov.in

---

**क्रमांक:-गौखनि-३१/०५२३/प्र.क्र.१९/ख-१** **दिनांक :- २१ ऑगस्ट,२०२३.**

**विषय : गौण खनिज-धुळे**
मौजे उप्परपिंड-२, ता. शिरपुर या वाळूगटातून उत्खनन करता न आलेल्या वाळूची रक्कम परत मिळणेबाबत.
मे. साईनाथ इन्फोटेक, प्रो.पा.किरण चंद्रकांत मैड,नाशिक

**संदर्भ :**- आपले पत्र क्र.गौ.ख./कवि/८१/२०२२ दि.२३/०१/२०२३

**शासन ज्ञापन:**

मौजे उप्परपिंड-२, ता. शिरपुर,जि. धुळे हा वाळूगट राष्ट्रीय महामार्ग क्र.६ (धुळे-नागपूर) च्या चौपदरीकरणाच्या शासकीय कामासाठी ३,५३४ ब्रास वाळू परिमाणाकरीता रुपये १,१३,९०,०८२/- इतक्या रक्कमेस मे. साईनाथ इन्फोटेक, प्रो.पा.किरण चंद्रकांत मैड यांना दि. ३०/०६/२०१८ पर्यंतच्या कालावधीसाठी मंजूर करुन वाळू गटाचा ताबा दिनांक २०/०३/२०१८ रोजी दिला. सदर वाळूगटातून वाळूचे अवैधरित्या उत्खनन केल्याच्या कारणास्तव उपविभागीय अधिकारी, शिरपूर यांनी दंडात्मक रक्कमेची आकारणी करुन सदर वाळू घाट रद्द करण्याची शिफारस अपर जिल्हाधिकारी, धुळे यांना केली. त्यानुषंगाने अपर जिल्हाधिकारी, धुळे यांनी सदर वाळू घाट रद्द केला होता. अपर जिल्हाधिकारी, धुळे यांचे आदेश अपर आयुक्त, नाशिक यांनी कायम केले होते. सदर आदेशान्वये व्यथित होऊन अर्जदार यांनी मा.मंत्री (महसूल) यांचेकडे अपील दाखल केले होते. तत्कालिन मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक २०/०७/२०२१ च्या आदेशान्वये अपर आयुक्त नाशिक यांचे रद्द केले.

**०२.** अर्जदार यांनी वाळू गट रद्द केल्याने उत्खनन करता न आलेल्या वाळूची रक्कम परत करण्याची केलेली विनंती अपर जिल्हाधिकारी, धुळे यांनी अमान्य केली. तसेच, सदर आदेश अपर आयुक्त, नाशिक यांनी कायम केले. अपर आयुक्त, नाशिक यांच्या आदेशाने व्यथित होऊन अर्जदार यांनी मा. मंत्री (महसूल) यांचेकडे दाखल केलेल्या अपीलावर निर्णय घेऊन मा.मंत्री (महसूल) यांनी अपर आयुक्त, नाशिक यांचे आदेश रद्द केले आहेत. प्रकरणी मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक २८/१०/२०२० रोजी पारीत केलेले आदेश व त्यानुषंगाने जिल्हास्तरीय समितीचा निर्णय विचारात घेता मौजे उप्परपिंड-२, ता. शिरपुर,जि. धुळे या वाळू गटातून उत्खनन करता न आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रु.२२,१०,९७८ /- (रुपये बावीस लाख दहा हजार नऊशे अठ्ठ्याहत्तर फक्त) परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**०३.** सबब, अर्जदार मे. साईनाथ इन्फोटेक, प्रो.पा.किरण चंद्रकांत मैड यांनी लिलावाची संपुर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन करता न आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रु.२२,१०,९७८ /- (रुपये बावीस लाख दहा हजार नऊशे अठ्ठ्याहत्तर फक्त) अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०८२२१५१६१७४०१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2023.08.22 15:20:05 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
**जिल्हाधिकारी, धुळे**
**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०००३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७) निवडनस्ती